**भूकर पाहणी क्र.८५०, भायखळा विभाग, १६ कामाठीपुरा, ४ थी गल्ली, ई विभाग, मुंबई ४०० ००८ या मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सूट देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र.दुऊसू-१०१३/प्र.क्र.१०५/दुवपू.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. १६.०४.२०१५

**संदर्भ :-** मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळाचे ना हरकत प्रमाणपत्र क्र.R/NOC/FSI १.३३ /F-Gen/४६१५/MBRRB-१०, दि.२२.११.२०१०

**शासन निर्णय :-**

भूकर पाहणी क्र.८५०, भायखळा विभाग, १६ कामाठीपुरा, ४ थी गल्ली, ई विभाग, मुंबई ४०० ००८ या मालमत्तेची मालकी अखिल भारत मेरु शिंपी समाज या मेरु शिंपी समाजाच्या विश्वस्त संस्थेकडे असून बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या मान्यतेने व मुंबई इमारत दुरस्ती व पुनर्रचना मंडळाच्या ना हरकत प्रमाणपत्रानूसार १.३३ चटई क्षेत्र निर्देशांकानूसार सदर मालमत्तेची पुनर्बांधणी करण्यात आलेली आहे. मुंबई इमारत दुरस्ती व पुनर्रचना मंडळाच्या ना हरकत प्रमाणपत्रातील अट क्र.३ नूसार पुनर्रचित इमारतीस भोगवटा प्रमाणपत्र मंजूर करण्यापूर्वी सदर मालमत्तेस उपकरातून सूट मिळविणे आवश्यक आहे. इमारत बांधून पुर्ण झालेली असल्याने, ना हरकत प्रमाणपत्रातील अटिनूसार सदर मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सूट देण्याची विनंती अखिल भारत मेरु शिंपी समाज विश्वस्त संस्था यांचेमार्फत त्यांच्या दि.१८.४.२०१३ च्या पत्राव्दारे या विभागास करण्यात आली आहे.

भूकर पाहणी क्र.८५०, भायखळा विभाग, १६ कामाठीपुरा, ४ थी गल्ली, ई विभाग, मुंबई ४०० ००८ या मालमत्तेवरील संपूर्ण इमारत ही अनिवासी वापरात असल्याने म्हाड अधिनियम, १९७६ मधील भाग (८) कलम ८३ (१) अंतर्गत पोट कलम (आय) (एफ) व (जे) मधील तरतुदीनुसार दुरुस्ती उपकरातून सूट मिळण्यास पात्र आहे. तसेच सदर ठिकाणी जुनी इमारत पाडुन त्याठिकाणी नवीन इमारत उभी करण्यात आलेली असल्याने, म्हाड अधिनियम, १९७६ मधील भाग (८) कलम ८३ (१) अंतर्गत पोट कलम (एन) नूसारही सदर मालमत्ता दुरुस्ती उपकरातून सुट मिळण्यास पात्र आहे.

उपकरप्राप्त इमारतींच्या मालकाने/भाडेकरूंनी उपकरातून सूट मिळण्याबाबत शासनाकडे अर्ज केल्यास व ती इमारत दुरूस्ती उपकरातून सूट मिळण्यास पात्र असेल तर अशी सूट त्यासाठी शासनाकडे करण्यात आलेल्या अर्जाच्या दिनांकापासून देण्यात यावी, असा निर्णय मा.मुंबई उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.४०२७/१९८७ पर्ल मॅन्शन को.ऑप. हाऊसिंग सोसायटी विरूध्द बृहन्मुंबई महानगरपालिका व रिट याचिका क्र.१६२४/१९९, प्रागजी वृंदावन प्रिमायसेर्स को.ऑ.हौ.सो. विरुध्द महाराष्ट्र शासन या दाव्यात दिलेला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने भूकर पाहणी क्र.८५०, भायखळा विभाग, १६ कामाठीपुरा, ४ थी गल्ली, ई विभाग, मुंबई ४०० ००८ या मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सुट देण्याची विनंती केल्याच्या दिनांकापासून म्हणजे दि.१८.४.२०१३ पासून उपकरातून सुट देणेबाबतचे आदेश अर्जदारावर/ मालमत्ताधारकावर बजावण्यापर्यंतच्या तारखेपर्यंतच्या कालावधीत सदर मालमत्तेच्या दुरुस्तीकरीता

झालेल्या खर्चाची रक्कम संबंधित अर्जदार/मालमत्ताधारक यांचेकडून वसूल करण्याच्या अधिन दुरुस्ती उपकरातून सुट देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७११०२११२७०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

Prashant P Badgeri

Digitally signed by Prashant P Badgeri
DN: CN = Prashant P Badgeri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.17 11:13:40 +05'30'

**( प्र.पु.बडगेरी )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महानगरपालिका भवन, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
२. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
३. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
४. सहायक कर निर्धारणा व संकलक, अे विभाग कार्यालय, १३४-ई, शहीद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई ०१.
५. मुख्य लेखा अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
६. विश्वस्त, अखिल भारत मेरु शिंपी समाज, १६ कामाठीपुरा, ४ थी गल्ली, मुंबई ४०० ००८
७. निवड नस्ती, कार्यासन दुवपू-१.